**सोलापूर महानगरपालिकेतील विभागीय कार्यालयाकडील प्रभाग संख्या व क्रमांक निश्चितीकामी झालेला सोलापूर महानगरपालिकेचा सर्वसाधारण ठराव क्र.७१ दि.०९.०१.२०१८ महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (३) अन्वये अंतिमत: विखंडीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-एमयुएन-२०१८/प्र.क्र.५७८/नवि-१८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- २३ नोव्हेंबर, २०२०**

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्र :- एमयूएन -२०१८/प्र.क्र.५७८/नवि-१८, दि.११.०२.२०१९
२) आयुक्त सोलापूर महानगरपालिका यांचे पत्र क्र. सआस/कक्ष-१/आस्था-१/१६३, दि. १७.०५.२०१९

**प्रस्तावना :-**

सोलापूर महानगरपालिकेने दि.०९.०१.२०१८ रोजी सर्वसाधारण सभेमध्ये ठराव क्र.७१ पारित केला असून त्यामध्ये सोलापूर महानगरपालिकेसाठी ८ ऐवजी ९ प्रभाग करण्याचा निर्णय घेतला आहे. तथापि, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम क्र.४५१ मधील तरतूदीनुसार ठराव महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या दृष्टिने हितावह नसल्याने विखंडित करण्याची आयुक्त यांनी दि.१२.०२.२०१८ रोजीच्या पत्रान्वये शासनास शिफारस केली होती.

प्रशासकीय कामाकाजाच्या सोयीसाठी विभागीय कार्यालयाची प्रभागानुसार रचना करावी लागणार असल्याने महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम २९ (अ) (१) नुसार ४.५० लाख ते १२.०० लाख लोकसंख्येसाठी जास्तीत जास्त ९ प्रभाग करण्याची तरतूद आहे. तसेच, अतिरिक्त लोकसंख्येसाठी प्रत्येकी १.५ लाख लोकसंख्येसाठी १ प्रभाग करण्याची तरतूद आहे.

सोलापूर शहराची सन २०११ ची लोकसंख्या ९.५१ लक्ष इतकी असून त्यानुसार अधिनियमातील तरतूदी विचारात घेऊन ७ प्रभाग पूर्ण होतात. उर्वरित ०.५१ लक्ष लोकसंख्येसाठी आणि मागील ७ वर्षात वाढलेली लोकसंख्या विचारात घेऊन तसेच सोलापूर महानगरपालिकेच्या क्षेत्रातील दैनंदिन कामकाजासाठी भौगौलिक सलगता व प्रशासकीय नियंत्रणाच्या दृष्टिने ८ प्रभाग निश्चित होणे अपेक्षित आहे. तथापि, महानगरपालिकेने ९ प्रभाग करण्याचे निश्चित केल्याने त्यासाठी
१ विभागीय कार्यालय, कार्यालयीन इमारत, प्रभाग अधिकारी, इतर आवश्यक कर्मचारी उपलब्ध करुन द्यावा लागणार आहे. सदर बाब महानगरपालिकेस आर्थिक दृष्टया परवडणारी नाही. सबब, अधिनियमातील कलम २९-अ (१) नुसार ठराव सार्वजनिक हिताच्या विरुध्द असल्याने अधिनियमाच्या कलम ४५१ (२) नुसार महानगरपालिका सर्वसाधारण सभा दि.०९.०१.२०१८ रोजी पारित केलेला ठराव क्र.७१ विखंडित करण्याची

आयुक्त, सोलापूर महानगरपालिका यांनी शिफारस केली. सदर बाबी विचारात घेऊन महानगरपालिका सर्वसाधारण सभेने अधिनियमाच्या कलम २९-अ (१) च्या तरतूदीच्या विपरीत ठराव पारित केला असल्याने सदरचा ठराव अधिनियमाच्या कलम ४५१ (१) अन्वये दि.११.०२.२०१९ रोजीच्या आदेशान्वये निलंबित करण्यात आला होता. यासंदर्भात आयुक्त सोलापूर महानगरपालिका यांनी दि.१७.०५.२०१९ रोजीच्या पत्रान्वये शासनास कळविल्यानुसार विहीत मुदतीत कोणतेही अभिवेदन सादर न झाल्याने सदरचा ठराव अधिनियमाच्या कलम ४५१ (३) मधील तरतुदीनुसार अंतिमत: विखंडीत करण्याची शासनास शिफारस केली आहे. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

**<u>शासन निर्णय:-</u>**

सोलापूर महानगरपालिकेच्या सर्वसाधारण सभा ठराव क्र. ७१, दि. ०९.०१.२०१८ रोजी पारीत केलेला ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम १९४९ च्या कलम २९ (अ) (१) प्रमाणे महानगरपालिकेच्या आर्थिक हितास बाधा आणणारे तसेच अधिनियमाच्या विरुध्द ठराव पारीत केला असल्याने दि. ११.०२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये ठराव निलंबित करण्यात आला होता. यासंदर्भात विहीत कालावधीत कोणतेही अभिवेदन शासनास सादर न झाल्याने आयुक्त सोलापूर महानगरपालिका यांनी दि. १७.०५.२०१९ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या शिफारशीनुसार सदरचा ठराव महानगरपालिकेच्या अधिनियमातील कलम ४५१ (३) मधील तरतुदीनुसार अतिमत: विखंडीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११२३१३०८४३३९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

VILAS NATHA DHAIJE

Digitally signed by VILAS NATHA DHAIJE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2cbfac8a74f547d6db7c665bc59a04c3d5f9e582a842e3ae0aac1309f797f88a, serialNumber=9b34e2dd1552c4209100df5fb96a2cdcb5ce5ac0a7e1df80a5aa7ed2f6e611a5, cn=VILAS NATHA DHAIJE
Date: 2020.11.23 13:16:45 +05'30'

**(वि.ना. धाईजे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा. मंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री, नगर विकास विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) महापौर, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर
४) आयुक्त, सोलापूर महानगरपालिका, सोलापूर
५) महापालिका सचिव, सोलापूर महानगरपालिका
६) निवड नस्ती (नवि-१८), नगर विकास विभाग.